March 1992 Phalgun 1913



मूल्य : रु. २२.००

प्रकाशक, प्रकाशन विभाग, माहिती आणि नभोवाणी मंत्रालय, भारत सरकार,
पटियाला हाऊस, नवी दिल्ली-१
मुखपृष्ठ - रेखाटने - हर्षा शाह, स्वाती जोशी.

प्रकाशन विभाग ● विक्री केन्द्र

- सुपर बझार, कॅनॉट सर्कस, नवी दिल्ली-११० ००१.
- कॉमर्स हाऊस, करीमभॉय रोड, बेलार्ड पिअर, मुंबई-४०० ०३८.
- ८, एस्प्लनेड ईस्ट, कलकत्ता-७०० ००१.
- एल. एल. ए. ऑडिटोरियम, ७३६, अण्णामलाई, मद्रास-६०० ००२.
- बिहार स्टेट को ऑपरेटिव्ह बँक बिल्डिंग, अलोक राजपथ, पटणा-८०० ००४.
- प्रेस रोड, त्रिवेंद्रम-६९५ ००१.
- १०-बी, स्टेशन रोड, लखनौ-२२६ ००४.
- स्टेट अर्चालॉजिकल म्युझिअम बिल्डिंग, पब्लिक गार्डन, हैदराबाद-५०० ००४.

मुद्रक : मॉडर्न आर्टस अँड इंडस्ट्रिज, १५१ ए टू झेड इंडस्ट्रियल इस्टेट, मुंबई-४०० ०१३.

# प्रकाशकीय

बालकुमारांच्या हाती ख्यातनाम लेखक डॉ. विजया वाड यांच्या कथांचा खजिना देताना आम्हाला आनंद होत आहे. डॉ. वाड यांची तुमच्याशी मासिकांतून केव्हाच गट्टी जमली आहे. त्यांचा मी अधिक परिचय तो काय देणार.

भारत सरकारच्या माहिती आणि प्रसारण खात्याच्या प्रकाशन विभागातर्फे मुलांसाठी विविध भाषांमधे काही पुस्तकं प्रसिद्ध करण्याचं ठरविण्यात आलं. फारच कमी दिवसांत हे काम पूर्ण करायचं होतं. मराठी पुस्तकांच्या संपादनाची जबाबदारी आमच्या योजनेचे संपादक श्री नीतीन केळकर यांच्यावर सोपवली होती. त्यांच्या प्रयत्नांमुळेच हे पुस्तक आपल्यापर्यंत पोहोचवणं शक्य झालं. त्यांचेही आभार.

*डॉ. श्यामसिंह शशि*
संचालक

# फुलवा

अगदी चिमुकलं गाव होतं ते. गाव कसलं म्हणा.... छोटीशी वसाहतच म्हणणं बरं दिसेल. सातपुड्याच्या कुशीत लपलेली, दगडांच्या ओबडधोबड नक्षीनं चहुअंगांनी वेढलेली.... नि आजूबाजूच्या जगाचा कसलाही गंध नसलेली.... अशी.

तिथं रहायची एक चिमुरडी. मोठी खट्याळ नि मिष्किल होती पोरटी. त्या आजूबाजूच्या दगडाळ डोंगरातून एकसारखी आपली भिरिभिरी भटकत असायची ती. तिची आई म्हणायची, .... 'तुले फुलवा म्हणून पुकारायची नाय गो आताक्.... भिंगरी म्हणूक् भिंगरी....!'

हे झालं आपलं त्यांच्या भाषेत. पण अशी भिंगरीसारखी भटकायची पहा ती. आणि तीसुद्धा एकटी नाही.... तिच्याबरोबर असायचं एक बारकसं पिल्लू.... कुणाचं माहिताय ? .... ते होतं बकरीचं; एक बारकंसं गोडुलं पिल्लू!

फुलवा जिथे जिथे जायची ना.... तिथे तिथे हे आपलं असायचंच. तिच्या मागे टणाटणा उड्या मारीत पळायचं. इतकं गोड नि गोजिरवाणं होतं ते.... लोण्यासारखं पांढरं शुभ्र नि मऊ अंगाचं. त्याचे डोळेदेखील इतके चमकदार होते की बघितल्याबरोबर ते पिल्लू प्रत्येकाला आवडायचं. फुलवानं त्याचं नाव काय ठेवलं होतं ठाऊक आहे? हसूच येईल तुम्हाला.... 'कालूराम!....'

आता एवढं गोड.... गोंडस नि पांढरं पिल्लू ते.... नि नाव काय तर म्हणे कालूराम.

का माहिताय?

हे पिल्लू जन्मलं ना तेव्हा म्हणे फुलवाच्या बाबांनी तिला चिडवलं.... 'बघ बघ! कसं दुदागत पांढरं धोप दिसताय त्ये! तुज्यापरीस ह्याक गोरं पान!....'

फुलवा अशी चिडली अशी चिडली की त्याचं बारसं तिनं हट्टानं 'कालूराम' ह्या नावानंच केलं.

आता कधी कधी ती त्याला लाडानं गोरू.... चांदव्या.... सुर्व्या.... अशी वेगवेगळया नावाने हाका मारायची.... पण त्याचं पाळण्यातलं नाव तिनं ठेवलं होतं कालूराम. कालूराम तिचा भारी लाडका

होता. एक क्षणही चैन पडायचं नाही तिला त्याच्याशिवाय आणि कालूराम तर फुलवाची पाठच सोडायचा नाही. सगळ्या पाऊलवाटा त्यांनी बरोबरीनं तुडवल्या होत्या. फुलवाच्या ओळखीचा प्रत्येक दगड कालूरामदेखील ओळखीत होता. फुलवाच्या ओळखीचं प्रत्येक झाड कालूच्या पण ओळखीच होतं. नि त्या वस्तीतही जी जी माणसं फुलवाला खूप खूप आवडायची ना . . . . तीच फक्त कालूला आवडायची. बाकीच्या कुण्णा कुण्णाला तो अंगाला हातदेखील लावू द्यायचा नाही.

तर अशी होती ती जोडगोळी. फुलवा नि कालू. कालू नि फुलवा !

नि फुलवा होती तरी केवढी ? अगदी छोटुकली. अवघी नऊ वर्षांची होती पोरगी. पण भीती कशी ती ठाऊक नव्हती तिला. तिचं एकसारखं ते हुंदडणं बघून तिची आईच घाबरायची. पण फुलवा ? छे नाव नको ! . . . .

त्या दिवशी अशीच सकाळी सकाळी फुलवा बाहेर पडली. आपल्या भुरभुर झिपऱ्या तिनं एका वेलीच्या कोवळ्या फांदीने करकचून बांधल्या . . . . नि पळाली बाहेर.

आता ती पळाली म्हणजे तिच्याबरोबर कालूरामसुद्धा पळालाच. कारण जोडीच होती त्यांची तशी.

'अगो भिंगरे . . . . वो ऽऽ भिंगरे ऽऽ !'

पण आईच्या हाका तिच्या कानापर्यंतसुद्धा पोचल्या नाहीत . . . . इतक्या दूर पळाली होती ती. आणि काय गंमत झाली; तिथून वाहाणाऱ्या इवलुकशा ओढ्याच्या काठावर एक हसरं . . . . नाचरं फूल दिसलं फुलवाला. अगदी तिच्याचसारखं. त्याचा रंग आभाळागत निळा होता नि त्या फुलाचा मधला गेंद पिवळ्या नि किरमिजी रंगांनी इतका काही सुंदर दिसत होता की जसा काही रंगीबेरंगी गालिच्याचा एक तुकडाच कुणी कापून लावला होता तिथं. फुलवाला ते फूल इतकं आवडलं, इतकं आवडलं की धावतच ती त्या फुलापाशी गेली. कालूराम तिच्या मागोमाग गेलाच.

फुलवानं हळूच आपले गुडघे हिरवळीवर टेकले, ओढ्याच्या पाण्यात हात स्वच्छ धुतले नि झग्याला चोळून चोळून पुसले.

आपल्या मऊ स्वच्छ हातांनी तिनं त्या किरमिजी पिवळ्या गालिच्याच्या तुकड्याला अगदी हळू ऽऽच स्पर्श केला इतका हळू की जसं फुलपाखरूच बसलं होतं तिथं.

त्या फुलानं तिला वेडं केलंन अगदी. फुलवाचं एकसारखं त्या फुलाला कुरवाळणं मुळीच आवडलं नाही कालूरामला. त्यानं दोनतीनदा ओरडून आपला राग फुलवाला दाखवलाच.

पण छे.... फुलवाला त्या निळसर.... गोडुल्या फुलाशिवाय दुसरं काहीसुद्धा दिसत नव्हतं. नि ऐकायला देखील येत नव्हतं. अशीच होती ती....नादिष्ट....

कालूरामला इतका राग आला.... इतका राग आला.... की त्यानं सरळ पाठ फिरवलीन आणि पळत सुटला तो.

कुठे म्हणता!

घरी?

छे! फुलवावर खूप खूप रागावला होता ना तो.... आता बरा घरी जाईल? तो पळाला तो थेट समोरच्या डोंगरावर. मधेंच त्याच्या पायाला एक टोकदार दगड इतक्या जोराने बोचला की तो कळवळला. अगदी न राहवून ओरडला आणि दु:ख जरा कमी झाल्यावर त्या दगडाशीच भांडायला उठला.

त्याचं ते एकतर्फी भांडण चालू असताना काय गंमत झाली.... एक तरुण मुलगा त्याच्या पाठी येऊन उभा राहिला.

आता तुम्हांला वाटेल....कुठून बुवा हा मुलगा उपटला? तो कुठून आला माहिताय? डोंगरावरल्या एका झोपडीवजा घरातून.

त्यानं हळूच कालूरामला उचललं. एरवी कालूराम जोरात ओरडला असता. पण आज पाय दुखत होता ना त्याचा!

त्याची एक लहानशी पापी घेऊन तो तरुण म्हणाला....'ए बच्चू! असं दगडाशी कुणी भांडतात होय? वेडा कुठला?....'

कालूरामनं त्याच्याकडे निरखून पाह्यलं. त्याला खूप आवडला तो. नि तो काय म्हणाला बरं?....बच्चू! ....

कसं गोड नाव आहे.

कालूराम खूष झाला.

मुख्य म्हणजे त्याच्या मिठीत कालूला अगदी उबदार.... छानदार वाटत होतं .... इतकं.... की दुखणाऱ्या पायाचा त्याला विसरच पडला.

तो तरुण मुलगा मग हलके हलके चढण चढला. कालूशी मजेत गप्पा मारीत, त्याला आंजारीत

गोंजारीत तो आपल्या घरात शिरला. आणि त्यानं कालूरामला अलगद आपल्या गादीवर ठेवलं.

इतकं बरं वाटलं कालूला ! त्यानं झक्कपैकी ह्या टोकापासून त्या टोकापर्यंत लोळण घेतलीन. फुलवाकडे एवढी मऊ मऊ नि सुंदर गादी त्याला कधी मिळाली नव्हती.

आणि एकदम त्याला फुलवाची आठवण झाली. गादी नसली म्हणून काय झालं ? घासातला घास नाही का काढून द्यायची ती त्याला ? त्याच्याशिवाय एक मिनिट चैन पडायचं नाही तिला . . . .

नि आता मात्र . . . . कालूला फुलवाच्या आठवणीनं मग चैनच पडेनासं झालं.

आणि काय आश्चर्य !

'कालू ऽ ऽ कालूराम,' . . . . अशा हाका त्याला ऐकायला यायला लागल्या.

'आता आठवण झाली वाटतं हिला ?' कालूनं रागानं नाक उडवलं. पण त्याला राहवलं मात्र नाही. आपला दुसरा पाय तस्सा नाचवीत तो थेट झोपडीबाहेर पळाला. फुलवाला त्याच परिसरात पाह्यलीन त्यानं नि काय झालं कोणास ठाऊक . . . . तिच्या हाका ऐकून तो एकदम ओरडलाच.

फुलवाचं लक्ष गेलं तसा खूप खूप आनंद झाला तिला. त्याला शोधून ती दमून गेली होती खरं तर. पण तो सापडल्यावर तिचा सगळा शीण पार कुठल्या कुठे पळाला. आणि मग ती जी धावली . . . . जी धावली . . . . ती त्या झोपडीकडे.

आता कालूला खरा आनंद झालाच होता मनातनं . . . . पण त्यानं उगाचच्या उगाच फुलवाचं मघाचं वागणं आठवून नाक फुगवलं, डोकं हलवलं नि तो एकदम आत निघून गेला. गादीवर चढून बसला.

फुलवा सरळ आत घुसली. तिनं त्याच्याकडे झेप घेतली. त्याला कुरवाळीत ती म्हणाली. ' . . . .कालूराम . . . .माजो बछडो ऽ ऽ माजो बछडो . . .' जशी तिची आई तिला कुरवाळायची नि म्हणायची ना . . . तश्शी ! कालूराम इतका खुशीत होता . . . इतका खुशीत होता की मघाचं सगळं भांडण तो विसरून गेला अगदी.

तेवढ्यात मागून कुणाचा तरी आवाज ऐकू आला. 'तुझाय का हा बच्चू ?'

फुलवा तर इतकी दचकली . . . इतकी दचकली . . . की कालूच्या पाठीवरून फिरणारा तिचा हात थांबलाच क्षणभर . . .

तिनं मागे वळून पाह्यलं. कोण ते ? तो तर मघाचाच तरुण मुलगा होता. इतक्या सुसाट वेगानं ती

तिथे धावत आली होती की त्याचं तिथे असणंच मुळी तिच्या लक्षात आलं नव्हतं.

आपले इवलेसे हात आपल्या धडधडत्या छातीवर ठेवलेन् तिनं. कालूला ह्या मुलानं पळवून तर नाहीना आणलन् ?

ही गोष्ट मनात आली . . . बस्! फुलवा पटकन कालूरामकडे वळली . . . नि त्याला झटकन् उचलून घेऊन ती म्हणाली . . .

'माजोय तो.'

'त्याच्या पायाक दगड बोचलो बग . . .' त्या तरुणानं हळुवार हातानं कालूच्या दुखऱ्या पायावर हात ठेवला.

'अयाई ऽ ऽ' ती अशी कळवळली . . . अशी कळवळली की जसं काही तिलाच लागलं होतं. तिचाच पाय दुखावला होता. 'माजो कालूराम . . .माजो सुर्व्या . . . माजो चांदव्या तो,' . . . ती प्रेमानं कालूरामला हाका मारीत राह्यली. त्याला कुरवाळीत राह्यली. त्याचे मुके घेत राह्यली.

कालूरामला इतकं बरं वाटलं . . . इतकं बरं वाटलं . . .की विचारू नका अगदी.

'नाव काय तुझं ?' त्या तरुणानं फुलवाला विचारलं.

तिने क्षणभर टक लावून त्याच्याकडे पाह्यलं आणि तिला धीर आला. भीती कुठल्या कुठे पळाली. कालूरामला कुरवाळीत गोड हसून ती म्हणाली . . . 'फुलवा ! फुलवाय माजो नाव.'

'वा फार छान. माझं नाव श्याम. तू मला श्यामदादा म्हण. श्यामदादा ! . . . काय ? येशील इथं मधून मधून ? मी तूला माझ्यासारखं छान बोलावयाला शिकवीन.'

'श्यामदा !' . . . फुलवानं त्याच्या नावाचा उच्चार करून पाह्यला. कृष्णाच्या मुरलीसारखं मंजुळ मंजुळ वाटलं तिला. . . . नि खुदकन हसू आलं.

'का ग ? का हसलीस ?'

'अहं !' तिनं जोराजोरानं डोकं हलवलं.

'बरं बुवा नको सांगूस,' असं म्हणून रुसल्यासारखा तो तिच्याकडे पाठ करून बसला.

'श्यामदा !' मले तू आवडला.'

'खरं?' त्यानं एकदम वळून विचारलं.

'हो!' तिनं गोड हसून होकार भरला.

'आणि मलासुद्धा खूप खूप आवडली एक धिटुकली पोर.' तो मोठ्यांदा म्हणाला. नि मग झटकन् कालूरामकडे बघत म्हणाला... 'नि त्या धिटुकलीचा हा मैतरसुद्धा बरं का! खरं म्हणजे त्याच्यामुळेच तर माझी या गोड पोरीशी ओळख झाली.'

आणि मग कितीतरी वेळ श्यामदादा नि फुलवा गप्पा मारत राह्यली.

कालूरामला श्यामदादानं मांडीवरच बसवलं होतं. म्हणून कालूही खुशीत होता.

श्यामदादा दगडाचा अभ्यास करण्यासाठी तिथे आला होता म्हणे.

दगडांचा देखील अभ्यास करतात हे ऐकून फुलवाला इतकं आश्चर्य वाटलं, इतकं आश्चर्य वाटलं की विचारूच नका.

माथ्यावर आलेल्या सूर्याचे कवडसे छतावरल्या झरोक्यातून जेव्हा थेट फुलवाच्या पायांवर पडले तेव्हा ती दचकून भानावर आली.

'कालू...चल्...' तिनं झटकन् उठून श्यामदादाचा निरोप घेतला.

'उद्या नक्की येशील ना?'

'हाँऽऽ' तिनं मोठ्ठा होकार भरला. कालूला घेऊन ती धावत सुटली. आपला दुखरा पाय हवेत नाचवीत कालू तिच्याबरोबर राहाण्याचा प्रयत्न करीत होता.

आता फुलवाला दुसरं तिसरं काही सुद्धा दिसत नव्हतं. दिसत होती फक्त तिची आई. तिची वाट पाहून दमलेली, शिणलेली, अगदी रडकुंडीला आलेली.

आता आईला काय् सांगायचं? का उशीर झाला? त्या निळुल्या फुलाशी बोलता बोलता झाला उशीर? की कालूला शोधता शोधता....?
की श्यामदादामुळे?
...छे!

तिच्या इवल्याशा जिवाला आता आईच्या गळ्यात पडायची अगदी धाई झाली होती.

दूर अंतरावर....डोळ्यावर हात धरून....'फुलवा...फुलवा गोऽ' म्हणून हाका मारणारी आई

जेव्हा तिला दिसली तेव्हा तर तिनं लंगडत धावणाऱ्या कालूरामला चक्क ओरडून सांगितलं . . . 'कालू . . .आये आली बग . . . माजी आये ऽ — ' नि ती वेगानं धावली. धपापत आईच्या गळ्यात पडली.

'आये ऽ रागास नुको येऊ . . . . माझी शानी शानी आये ऽ . . .' आईच्या अंगावर चढून तिनं तिचे मटामटा मुके घेतले. तिला अगदी बेजार करून सोडली.

अशीच होती ती. द्वाड!

नि तरीही मोठी लाघवी. हवीहवीशी वाटणारी.

कालूरामची लाडकी . . . .फुलवा!

## गुप्त खजिन्याचा शोध

फुलवानं त्यानंतर श्यामदादाशी बरीच गट्टी जमवली होती. तिची न त्याची गट्टी हे काही आता गुपित राह्यलं नव्हतं. तिच्या आईला . . . .बाबाला . . . .श्यामदादा येऊन भेटला होता.

इस्त्रीचे मऊ मऊ कपडे घालणारा, छान छान बोलणारा, कि खूप मोठ्ठी पुस्तकं घेऊन दगडांचा अभ्यास करणारा हा मोठ्ठा माणूस . . . .म्हणजे फुलवाच्या आईबाबांच्या दृष्टीनं कुणी देवदूतच होता जसा काही.

'आम्ही गरीब . . .अडानी . . .दुर्येवाचे दोडके . . .' असं ते म्हणत तेव्हा श्यामदादा त्यांची समजूत काढी.

'फुलवासारखी गोड, गुणी मुलगी ज्यांना देवानं दिली ते देवाचे दोडके कसे ? ते तर देवाचे लाडके. पहा कशी ती भराभर चांगलं बोलायला शिकत्येय,' तो उत्साहानं म्हणाला होता.

फुलवाला आता हे एक नवीनच खेळणं मिळालं होतं. सकाळी लवकर उठून भाकर खाऊन नि अंग धुऊन जे जायचं ते थेट कालूला घेऊन श्यामदादाकडे. तो अभ्यासात असला तर तिथंच आवारात खेळायचं. अभ्यासात नसला तर तो जे जे बोलेल तसं बोलायचं. अगदी तस्सं. नवे नवे शब्द शिकायचे. नि श्यामदादाशी गप्पा मारायच्या.

दुपारी सूर्य माथ्यावर आला की जेवायला खाली उतरायचं. कधी श्यामदादाचा निरोप घेऊन तर कधी श्यामदादाबरोबरच.

एक दिवस संध्याकाळी तिची लहर फिरली नि खेळ अचानक थांबवून ती आईला म्हणाली . . . 'आये ऽ मी श्यामदादाकडे जात्येय गो ऽ'

आई बाहेर येत्येय तोवर पोरगी पसार. कालूला घेऊन . . . निघाली ती थेट डोंगर चढायला लागली. तिच्या श्यामदादाकडे.

झोपडीजवळ आली नि क्षणभर तशीच उभी राहिली. थक्क होऊन. कट्टयावर श्यामदादा बसला होता. नि त्याच्या हातात होती मुरली. तिच्यातून निघणारे मंजुळ स्वर . . . .! छे . . .त्या मंजुळ स्वरांनी नि त्यातल्या नादमयतेनं बेचैन केलं फुलवाला. तिच्या पावलांना कुणीतरी अचानक गती दिली, लय दिली आणि पाहाता पाहाता श्यामदादाच्या मुरलीतून निघणारा प्रत्येक स्वर फुलवाच्या हलक्या फुलक्या पावलांना लय देऊ लागला. तिची पावलं . . . . एखाद्या परीच्या पावलांहूनही अलगद जमिनीला स्पर्श

करीत होती. . . . मध्येच उंचावत होती. कालूराम एवढा छोटा . . . पण तोदेखील फुलवाच्या त्या नाचऱ्या पावलांनी नि श्यामदादाच्या मुरलीच्या स्वरांनी भारावून गेला अगदी. इतका भारावून गेला . . . की उड्या मारायचा आपला स्वभाव विसरून तो अलगद श्यामदादाच्या पायाशी येऊन बसला. एकटक फुलवाकडे पहात!

श्यामदादानं आपल्या ओठांपासून मुरली बाजूला केली नि फुलवा?

हरवल्यासारखी आपल्या जागी उभी राहिली. स्तब्ध!

'फुलवा . . .किती सुंदर नृत्य करता येतं तुला,' श्यामदादानं कौतुकानं म्हटलं.

'नृत्य म्हणजे?'

किती निरागस प्रश्न! तिला नृत्य म्हणजे काय तेदेखील ठाऊक नव्हतं. पण तिच्या पावलांना . . . . तिच्या अंगातल्या कणाकणाला त्याची अनाम ओळख होती.

'नृत्य म्हणजे? . . . . नृत्य म्हणजे फुलवा!' श्यामदादा तिला हसून म्हणाला.

'आणि फुलवा म्हणजे?' फुलवानं खट्याळपणे श्यामदादाला विचारलं.

पण तो हरतोय थोडाच? लगेच म्हणाला . . . . 'फुलवा म्हणजे नृत्य. नृत्य म्हणजे फुलवा.' आता मात्र फुलवाला हसूच आलं.

'अग . . . . पऱ्यांची पावलं मी पाह्यली नाहीत. पण ती तुझ्या पावलांसारखीच असली पाह्यजेत. ही पावलं ना फुलवा . . . ह्या दगडाधोंड्यातून फिरण्यात वाया घालण्यासाठी नाहीतच मुळी. अग जादूय तुझ्याजवळ जादूऽ! . . . . ही पावलं वेडं करतील लोकांना . . . खरचं!'

तो काय बोलतोय ह्यातलं काहीसुद्धा कळत नव्हतं फुलवाला.

'तू काय बोलतोयस श्यामदादा?' तिनं त्याच्या गळ्यात हात टाकून विचारलं.

'सांगू?'

'हूं.'

'आमच्या फुलूजवळ एक गुप्त खजिना आहे . . . . गुप्त खजिना. त्याचा शोध कुणी लावला माहिताय? या मुरलीनं. अग . . . . आज मी हिला बाहेर काढली नि मला अचानक समजलं . . . . आमच्या फुलूला खूप खूप, खूपच छान नाचता येतं. तिला छान छान नाच शिकवला पाह्यजे. छान छान कपडे शिवले

पाहद्यजेत. कळलं?'

'कळलं,' तिने मान हलवीत म्हटलं. तिला खूप आनंद झाला होता ते ऐकून.

'आता मी मुंबईला एक पत्र लिहितो. मुंबई म्हणजे एक खूऽऽप मोठ्ठं शहर आहे. तिथं एक अशी छानदार शाळा आहे की तिथं नाच शिकवतात, गाणे शिकवतात, मुरलीसुद्धा शिकवतात विजवायला.'

'खरं?'

'अगदी खर्रर....'

'मला मुंबैला जायचं....' फुलवा नाचत नि गिरक्या घेत म्हणाली. तिच्या चिमुकल्या जगात किती नवीन नवीन गोष्टीची आज भर पडली होती.

नि श्यामदादा!

तो आता स्वस्थ बसणार नव्हता.

खडकाळ डोंगरातल्या ह्या चिमुकल्या सोनपरीला तो आता नवी वाट दाखवणार होता. अगदी नवी वाट.

## फुलवा कलानिकेतनमध्ये

त्याचं असं झालं. कला निकेतनचे प्राचार्य राजवाडे हे श्यामदादाच्या वडिलांचे अगदी सख्खे मित्र होते. फुलवाच्या अंगची कला पाहून श्यामदादाला अगदी मनापासून वाटलं.... हिला छान शिक्षण मिळालं पाहचजे. अगदी शास्त्रशुद्ध. आपल्या शहरात आई-बाबा मुलींच्या मागे लागतात. 'जा.... गाणं शिका.... पेटी शिका.... सतार शिका.... कथ्थक नाहीतर भरतनाट्यम् शिका.' मग त्यांचा आवाज गोड असो वा नसो. त्यांच्या पावलात नृत्याची जाण असो वा नसो. शिकवलं की येतं.... अशीच त्यांची कल्पना असते. मग ज्या मुलीच्या पावलात एवढी जादू आहे अशा या इवलुश्या गोड मुलीला अशी संधी नको मिळायला? तिला संधीच नाही मिळाली तर ती पुढे येणार कशी?

आणि संधी मिळाली तर.... कुणास ठाऊक?

ती एक भारतप्रसिद्ध.... एवढेच काय जगप्रसिद्ध नर्तकीसुद्धा होऊ शकेल. अगदी गरीब घरात.... कुठल्याही सुधारणेचा वारा न लागलेल्या झोपडीत ती जन्माला आली हा काय तिचा दोष?

त्यानं एक सुंदर पत्र लिहिलं. राजवाडेकाकांना खास विनंती करणारं. त्याच्या छोटुल्या नि गुणी मैत्रिणीसाठी काही तरी कराच म्हणून आग्रहाचं मागणं मागितलं.

आणि तो वाट पहात राहचला त्यांच्या पत्राची.

हल्ली फुलवा आली की त्या दोघांचा हा नवाच खेळ होऊन बसला होता.

त्यानं मुरली वाजवायची. हिनं नृत्य करायचं....

त्यानं स्वरांशी खेळायचं.... नि हिनं त्या स्वरांचं चित्र उभं करायचं.

'किती छान नाचतेस ग तू....' तो पुन्हा पुन्हा म्हणायचा.

नि फुलवा मग एक गोल गिरकी घेऊन त्याच्याजवळ येऊन बसायची. त्याची मुरली आपल्या हातात घेऊन म्हणायची.... 'ही नाचवते मला.'

फुलवाला श्यामदादासारखं छान बोलता येऊ लागलं होतं. लहान मुलं कोणतीही गोष्ट फार पटकन शिकतात. नि फुलवा तर तरल नि तल्लख पोरगी.... नि अगदी निर्मळ.

....वाहत्या झऱ्यासारखी अवखळ चपळ....

दिवस उगवत होते. मावळत होते.

नि नवा नाद निर्माण करीत होते . . . . आणि एक दिवस राजवाडेकाकांचं पत्र आलं ! श्यामदादाला ! . . . .

तसं कशाला. ते पत्रच आपण वाचूया ना.

प्रिय श्याम,

तुझं पत्र मिळालं. इतकी छान आहे का तुझी इटुकली मैत्रीण ? तिच्या अंगी खरोखरीच जर असा गुण असेल तर तिला आमच्या कलानिकेतनमध्ये मी अवश्य प्रवेश देईन. मात्र त्यासाठी मला अगोदर तिची छोटीशी परीक्षा घ्यावी लागेल. आपल्या देशातल्या गरीब . . . . अडाणी जमातीतल्या अशा हुशार गुणांचा विकास व्हायला पाहचजे. आणच त्या छोटीला तू इकडे. केव्हा घेऊन येतोस ते कळव.

प्रेमपूर्वक आशीर्वाद देऊन हे पत्र पुरे करतो.

तुझा,

राजवाडेकाका.

आणि मग श्यामदादाची एकच धांदल उडाली. फुलवा श्यामदादाकडे पोहचण्याअगोदर तोच तिच्या घरी गेला.

'अय्या ऽऽ श्यामदादा.'

'हो मीच. हे बघ पत्र.'

'पत्र ?'

'हो पत्र. मुंबैहून आलंय. तुला मुंबैला जायचंय ना शिकायला ?'

'हो ऽऽ . . . .'

'वाच मग.'

'अय्या ऽऽ . . . . मला वाचता कुठे येतं ? . . . .' फुलवा गालावर हात टेकवून श्यामदादाकडे पहात म्हणाली.

'तर वो ऽऽ' तिची आई पण म्हणाली. श्यामदादा इतका वेळ विसरूनच गेला होता की ही गोष्ट.

'अरेच्च्या ! असं झालं का ? बरं बरं. . . . आजपासून आता लिहिणं वाचणं शिकायला सुरुवात बरं का फुलू.'

'हो ऽऽ पण पत्र वाच ना श्यामदादा.'आणि मग श्यामदादानं ते पत्र अगदी सावकाश वाचून दाखविलं.

फुलवाच्या आईला एकीकडे खूप खूप आनंद झाला नि त्या आनंदात ती आपली रडायलाच लागली. जशी काही तिची लाडकी सोनुली तिला सोडून याच क्षणी मुंबैला गेली होती.

श्यामदादानं मग तिची समजूत घातली. तो नाही का दगडांचा अभ्यास करण्यासाठी आई-वडिलांना सोडून इतक्या लांब आला होता ! मोठं व्हायचं . . . . नाव कमवायचं म्हणजे कष्ट आलेच.

फुलवाचा बाबा तेवढ्यात आलाच. त्याला बराच लाकूडफाटा आज मिळाला होता. खुशीत होती स्वारी अगदी.

फुलवानं बाबाच्या गळ्याला एकदम गच्च मिठी मारली . . . . नि म्हणाली . . . . 'मी मुंबै जाताव बाबा . . . . श्यामदादा संगट.'

श्यामदादानं उत्साहानं अगदी संगतवार सगळं समजावून सांगितलं . . . . फुलवाच्या बाबाला. आपल्या पोरीच्या आउक्षाचं सोनं होणार म्हणून खूप खूप आनंद झाला फुलवाच्या बाबाला. एक गरीब अडाणी लाकूडतोड्या होता तो. लहानपणापासून आजतागायत फक्त कष्टच करीत आला होता. कष्ट . . . . कष्ट . . . . आणि कष्ट.

लाकूडफाटा तोडायला मिळाला नाही की खडी फोडायची . . . . काबाडकष्टात बदल इतकाच !

आपली लाडकी लेक मोठी होणार . . . . या कल्पनेनेच त्याला इतका आनंद झाला की काही विचारू नका. जशी काही फुलवा त्याच क्षणी प्रसिद्ध नर्तकी झाली होती.

आणि मग एकच धावपळ उडाली. फुलवाचं सामान बांधलं गेलं. तिच्यासाठी नवी गोधडी आईनं रातोरात शिवली. गुळाचे घारगे करून तिने फुलवाला आपल्या हातांनी भरवले. मजा होती न् काय !

फुलवा मुंबईला जायला निघाली तेव्हा आख्खी वस्ती फाट्यापर्यंत आली होती. कालूराम होताच की . . . . तिची पाठ थोडीच सोडणार होता तो ?

फुलवाच्या बाबानं खास बैलगाडी मागवली होती त्याच्या मित्राची. श्यामदादा, फुलवाचा बाबा नि फुलवा . . . . तिघं बैलगाडीत बसले तशी कालूनं टुणकन् उडीच मारलीन फुलवाच्या मांडीवर.

'याला निऊया न श्यामदादा,' फुलवानं खूपच हट्ट केला तेव्हा श्यामदादा म्हणाला.... 'अग कालूला बाहेर मोकळं भटकायची किती सवय आहे, मुंबईला बाहेर पडलं की एक एक पावलावर मोटार उभी असते मोटार. आपल्या कालूला बाहेरच पडता यायचं नाही. नि बाहेर पडला.... नि मोटारींचा धक्का लागला तर....

'नको ना श्यामदादा असं बोलू....' फुलवानं कानावर हात ठेवले.

'मग.... असा वेडा हट्ट नाई करायचा.'

'हूं.' फुलवाच्या तोंडून त्याहून एकदेखील अधिक शब्द बाहेर पडला नाही. तिनं ओठ घट्ट मिटून घेतले. पण तिचे डोळे? छे.... ते तिचं मुळीच ऐकायला तयार नव्हते. रडू फुटलं तिला.

फुलवाच्या बाबानं अलगद कालूला उतरवलंन. एका हातानं आसवं पुशीत दुसऱ्या हातानं तिनं त्याला टाटा केलं.

पण कालूला ते थोडंच रुचणार होतं? त्याने फुलवाकडे झेप घेतली.

पण...

खिल्लारी बैलांची जोडी आता उधळली होती. चिमुकल्या कालूची झेप तोकडी पडली. तो दणकन् जमिनीवर आपटला.

फुलवाला वाटलं... ताडकन् जमिनीवर उडी मारावी नि लाडक्या कालूला गच्च मिठीत घ्यावं... पण...

हे 'पण'च मोठे वाईट असतात नाही? फुलवाची बैलगाडी बऱ्याच दूर अंतरावर पोचली होती... नि वाढलेल्या अंतरावर कालूरामच्या जागी फक्त एक पांढरा धोप ठिपका दिसायला लागला होता.

बैलगाडीनं तेवढ्यात एक मोठ्ठं वळण घेतलं नि मग सारंच नजरेआड झालं. पण जे नजरेआड झालं ते सारंच मनाआड थोडंच होतं?

फुलवाचा एस्-टी-चा प्रवास आता सुरू झाला होता. तिच्या आयुष्यातला पहिला वहिला मोटार प्रवास.

तो घंटी वाजवणारा कंडक्टर... ती बसलेली नि उभी माणसं... तो ड्रायव्हर... नि गाडी पुढेपुढे जात असताना मागे मागे पळणारी झाडं.

तिच्या शेजारी बसला होता श्यामदादा. नि त्याच्याशेजारी बसला होता फुलूचा बाबा.

मध्येच कधीतरी काही नवीन दिसलं की ती प्रश्न विचारून श्यामदादाला भंडावून सोडी.

हळूहळू तिच्या डोळ्यावर पेंग आली आणि ती श्यामदादाच्या मांडीवर डोकं ठेवून शांत झोपून गेली —

फुलवा ऊठ . . . ऊठ फुलू . . मुंबई आली बघ,' श्यामदादा तिला जागं करीत होता.

डोळे चोळीत ती उठली. आता तिला भूकही बरीच लागली होती.

तिच्या बाबानं फडक्यात बांधून आणलेली शिदोरी सोडायला सुरुवात केली.

'राहू दे बाबा . . . आता आपण हॉटेलात जेऊया,' श्यामदादानं त्याला थोपवलं.

ती तिघे हॉटेलात गेली. तिथला काऊंटरवरला गोरापान इराणी बघून फुलवाला आश्चर्य वाटलं. तिथल्या फुलाफुलांच्या कपबशा बघून तिचं आश्चर्य आणखीच वाढलं. नि नंतर पांढऱ्या धोप डिशमधून आलेला रंगीबेरंगी केक पाहून ती चकितच झाली.

तिच्या वस्तीत होतं एक खोपटं. त्यातला काळाकुट्ट जमन्या अगदी तांबडा चहा करायचा. नि च्याऽऽ च्याऽऽ असं ओरडत मळकट्ट कपातून तो सगळ्यांना वाटायचा. एकदा दोनदा तो गुळकट नि तांबडा चुट्ट चहा ती प्यायली देखील होती तिच्या बाबाबरोबर. केक मात्र तिनं कधीच पाहचला नव्हता.

'खा ना. तुझ्यासाठीच मागवलाय तो,' श्यामदादाच्या बोलण्यासरशी ती भानावर आली.

तिनं तो रंगीबेरंगी केक हातात घेतला नि हळूच त्याचा एक तुकडा तोंडात टाकला. वा! काय मऊ नि सुरेख चवीचा होता केक तोंडात टाकल्याबरोबर विरघळत होता. तिनं भराभर बशीतला सगळा केक संपवला. श्यामदादानं मागवलेल्या खाऱ्या बिस्किटांचाही समाचार घेतला . . . नि मग तो फुलाफुलांच्या बशीतला दुधाळ सुंदर चहा तिने पिऊन टाकला.

'वा! . . . श्यामदादा! खूपच छान . . . मुंबै खूपच छान आहे,' ती आनंदून म्हणाली.

'श्यामदादा . . . ती . . ती बाई बघ. पोपटाच्या चोचीगत ओठ आहेत तिचे.'

'अग रंग लावलाय तिनं,' श्यामदादा हसून म्हणाला. 'लिपस्टिक म्हणतात त्याला.'

फुलवानं रंग लावलेल्या बायकाच पाहचल्या नव्हत्या कधी . . . तर कसं कळावं तिला ? तिची आई . . अगदी साधी भोळी बाई होती. नि तिच्या वस्तीतल्या इतर बायका पोरी . . . त्याही फुलवासारख्या . . . नि फुलवाच्या आईसारख्याच नव्हत्या का ?

'अय्याऽऽ . . . असे रंग कशाला लावायचे श्यामदादा ? ती मोठ्यांदा बोलली.

'हळू बोल, फुलू . . . लोक ऐकतील तर म्हणतील . . . या पोरीला काहीच कळत नाई,' श्यामदादा गमतीनं म्हणाला. पण तेवढ्यानेच ती फुगून बसली.

अगदी राजवाडेकाकांच्या शाळेत येईपर्यंत एक चकार शब्दसुद्धा बोलली नाही. जसे तिचे ओठ कुणी शिवून ठेवले होते . . . एकावर एक!

'फुलू . . . हे राजवाडेकाका . . . नमस्कार कर,' श्यामदादा म्हणाला. तिच्या बाबानंही तिच्या खांद्याला ढोसलं.

फुलवानं राजवाडेकाकांना पटकन वाकून नमस्कार केला. त्यांनी तिला जवळ घेतली.

'फुलवा . . . नाव काय तुझं बेटा ? . . .' त्यांनी विचारले.

'अय्या . . . आता तर म्हणालात . . . माझं नाव,' ती पटकन बोलून गेली. प्रथम नाव घेऊन वरती नाव विचारायची राजवाडेकाकांची गंमतशीर पद्धत पाहून तिला राहावलंच नाही.

'ओ ? असं झालं होय ?' राजवाडेकाका हसून म्हणाले.

'तर तर! तालमीत कुणाच्या तयार झालीय ती ? . . .' श्यामदादानं छाती फुगवली.

'वाऽऽ वाऽऽ वा! बरंऽऽ आता असं करा, १०८ नंबरच्या खोलीत तुम्ही लोक विश्रांती घ्या. संध्याकाळी आज वसंतोत्सव आहे. बरेच कार्यक्रम होणारेत. आज फुलवानंही कार्यक्रमात भाग घेतला पाहृजे बरं का! नाहीतर आम्ही शाळेत नाही घेणार आमच्या. हंऽऽ!

त्यांचे ते शेवटचे वाक्य ऐकून छोट्या फुलवाच्या छातीत धडकीच भरली. संध्याकाळी कार्यक्रम द्यायचा ? कार्यक्रम म्हणजे काय ? हा श्यामदादा म्हणजे —

— आणि पाहता पाहता संध्याकाळ येऊन ठेपलीच की. ती आल्यावाचून थोडीच राहाणार होती ? सगळीकडे रंगीबेरंगी गर्दी जमली होती. फुलवाच्या बाबाने तिलाही एक सुंदर चिरडी नेसायला दिली. तिच्या केसांचा गोंडा बांधून दिला.

'झ्याक नाचून दाखीव हा पोरी . . .?' त्यानं तिच्या पाठीत लाडानं एक धपका घालून म्हटलं.

फुलवानं मान हलवली. पण खरं तर तिला वाटत होतं . . . इथून आता . . . या क्षणी . . . पळून जावं. दूर . . . आपल्या आईजवळ. कालूजवळ! त्याला चैन तरी पडलं असेल का कालपासून ? छे . . . . !

पण ती बोलली मात्र काहीच नाही.

संध्याकाळी जेव्हा ती हॉलमध्ये गेली तेव्हा खूप गर्दी जमली होती तिथं. मखमलीचा मऊशार मोठ्ठा पडदा... कानावर पडणारे मंजुळ सूर... खोलीवर पसरलेला निळसर प्रकाश नि अत्तराचा गंध... सारंच नवीन होतं फुलवाला. तिच्या गरीब झोपडीनं यातलं काही म्हणता काही पाह्यलं नव्हतं.

आणि एकदम वाद्यांचा एकच गजर झाला. तो मखमली पडदा बाजूला झाला. आता काय दिसेल? फुलवानं श्यामदादाचा हात घट्ट धरला.

अरेच्चा! ही मुलगी कुठून आली? तिनं पाह्यल... तिचे भरजरी कपडे... तिचे गळाभर दागिने... केसांचा गुडघ्यापर्यंत आलेला लांबलचक शेपटा नि शेवटपर्यंत त्याला सोबत करणारी फुलवेणी. किती सुंदर दिसत होती ती मुलगी. आणि मग अनेक वाद्यांच्या साथीत तिनं नाचायला सुरवात केली. 'बघ... बघितलसं फुलू? ह्याला म्हणतात नृत्य! सुंदर नृत्य!' श्यामदादा तिला समजावून सांगत होता.

एकाहून एक सुंदर सुंदर कार्यक्रम तिथे पेश केले गेले. फुलवा सगळ्या कार्यक्रमांकडे पाहता पाहता गंभीर होत गेली. तिच्या चिमुकल्या हृदयावर दडपण आलं... इतकं चांगलं मला काही करता येईल का?

अन् ती विचार करत्येय तोच तिचं नाव पुकारलं गेलं. 'चल...' श्यामदादा तिला बोटाला धरून उठवीत होता. 'चल ना... आता मी मुरली वाजवतो.. नि तू नाच. समोर कोण आहे ह्याकडे बिलकूल लक्ष देऊ नको. हं... चल. फुलू.'

ती कचकड्याच्या बाहुलीसारखी उठली. श्यामदादाबरोबर स्टेजवर पोहोचली. श्यामदादाची नि फुलवाची ओळख राजवाडेकाकांनी शाळेतल्या सर्व विद्यार्थी-विद्यार्थिनींना करून दिली. टाळ्यांचा गजर झाला... नि घाबरून फुलवाला काहीच ऐकू येईनासं झालं. श्यामदादाच्या मुरलीचा आवाज हॉलभर घुमला... पण फुलवाच्या कानात? छे! हरवलीच होती ती.

हॉलभर हसण्याची खसखस पिकली. फुलवाला भान आलं. तेव्हा सगळीकडे नजर फरली तिची. सगळे तिला हसत होते. तिचे डोळे भरून आले... नि त्याच्या सरीवर सरी गालांवर धावू लागल्या.

राजवाडेकाकांनी तेवढ्यात उभं राहून एक टाळी वाजवली. सगळा हॉल शांत, स्तब्ध झाला. ते धीरगंभीरपणे स्टेजवर आले. आपल्या हातांनी त्यांनी तिला उचलून घेतली. तिचे डोळे पुसले.

तिला तशीच कडेवर घेऊन ते म्हणाले, 'गरीब चिमणी पोर. तिला हे सारं पाहून घाबरायला झालंय. नि तुम्ही तिला हसताय? हिच्या गावाला जाऊन काट्याकुट्यात उघड्या पायांनी फिरायची वेळ आली की तुमचे डोळेदेखील असेच भरून येतील... नि गावची सारी माणसं तुम्हांला हसतील. भारी आनंद वाटेल नाही मग? हा सगळा वातावरणाचा परिणाम असतो. ती तर अगदीच लहान आहे. अवघी नऊ वर्षांची पोर!...'

तेवढ्यात काय झालं कुणास ठाऊक... फुलवाचं आपल्या बाबाकडे लक्ष गेलं. राजवाडेकाकांच्या कडेवरून तिनं एकदम उडी मारली... नि स्टेजवरून झरझर उतरून ती बाबाच्या कुशीत शिरली. घट्ट कुशीत!

मग श्यामदादानं एकट्यानंच मुरली वाजवली नि त्या संध्याकाळचा कार्यक्रम संपला. सगळे हॉलमधून बाहेर पडले. हॉल रिकामा झाला. एका खुर्चीवर खिळून बसला होता फक्त एक गरीब अडाणी माणूस... आणि त्याची लाडकी लेक फुलवा. त्या अडाणी बापाचे डोळे भरून आले होते... नि फुलवा? तिच्या डोळ्यांना जसा पूर आला होता.

. . . .श्यामदादा आला नि न बोलता तिला खोलीवर घेऊन गेला. फुलवाचा बाबाही त्यांच्यापाठोपाठ आलाच.

एखाद्या मोठ्या माणसागत फुलवा अगदी गप्प होती. श्यामदादाच मग बोलता झाला. 'फुलू . . . .सोड तो विषय मनातनं आता. नव्या दिवशी माणसानं नवीन विचार करावा. म्हंजे काय ? समजलं की नाई तुला फुलवा ?'

'समजलं.'

'काय समजलं ?'

'म्हंजे आज वाईट वाटलं तरी उद्या ते विसरायचं.'

'शाब्बास . . . अगदी हेच . . . हेच म्हणायचं होतं मला फुलू ! तू खूप हुशार आहेस. आठ नऊ वर्षांच्या पोरीला कळावं त्यापेक्षा कितीतरी अधिक कळतं तुला. फुलू . . . मनातली भीती काढून टाक. तू खूप शिकशील इथं राजवाडेकाकांच्या शाळेत . . .'

'मला घेतील का ते पण ?' फुलवाचे डोळे बोलता बोलता भरून आले.

श्यामदादानं तिला न बोलता जवळ घेतलं. 'कोण घेणार नाही आपल्या शाळेत एवढ्या गोड मुलीला ? पूस बघू डोळे. अं ? शाणी ती. फुलू . . . आता मी मुरली वाजवतो . . . वाटतंय का . . . वाटतंय नाचावसं ? फुलू ? तिनं नुसतीच होकारार्थी मान हलवली. 'हास बघू आधी. नेहमीसारखी. छानपैकी ! ए फुलू . . .' त्यानं तिला आर्जवानं म्हटलं.

तिनं आपल्या चिमण्या हातांनी त्याच्या गळ्यात हार गुंफला . . . नि ती हसली. हळूच अस्फुट ! . . . किती छान होतं ते हसू !

'फुलू तू हसलीस ना की ओढ्याकाठी निळुली फुलं उमलल्यागत वाटतं बघ.'

'खरं ?' आता मात्र असं विचारताना तिची कळी खुलली होती. त्या निळुल्या फुलानंच नव्हतं का एकदा तिला वेड लावलं ? नि तिचा कालू हरवला होता. पण कालू हरवला होता म्हणून तर श्यामदादा सापडला. त्या साऱ्या आठवणी तिच्या मनात जाग्या झाल्या. तो ओढा . . .ती फुलं . . . ती वस्ती . . . तो डोंगर . . . नि तिच्यापुढे उड्या मारणारा कालूराम.

अंगात नवा उत्साह यावा तशी ती भारल्यागत उठली. 'हं ! श्यामदादा . . . वाजव ना तुझी ती मुरली . . .'

'ऐकलास ? ऐकलास तो घंटेचा मंजुळ नाद ?' श्यामदादानं तिच्या प्रश्नाला उत्तर न देता तिचं स्पष्ट ऐकू येणाऱ्या घंटानादाकडे लक्ष वेधले.

पाठोपाठ गाण्याचे मधुर आलाप आसमंतात घुमले. वीणेचा झंकार त्याला साथ देऊ लागला.

'आयी बरसत बहार . . .'

शब्दांनी आता सुरांना सजवलं होतं. क्षणभर भारलेली फुलवाची पावलं एकदम हलकी झाली. हलक्या फुलागत अगदी ! आता तिची राहचलीच होती कुठे ? त्या गाण्याच्या प्रत्येक स्वराला तिचं शरीर एक सुरेख रूप देत होतं. डौल देत होतं.

तिला आता समोर कुणीसुद्धा दिसत नव्हतं. तिचा बाबा . . . श्यामदादा . . . नि खोलीच्या दारात अचानक येऊन उभे राहचलेले राजवाडेकाका . . .

छे . . . फुलवाला आता फक्त दिसत होतं ते स्वरमंडल.

खरंच ! फुलांचा गंध दिसणं . . . स्वरांचं रूप दिसणं . . . असले अनोखे प्रकार अनोख्या कलावंतांच्याच वाट्याला येतात. सामान्य माणसाला असलं कुठे अनुभवता येतं काही ?

कधी तरी वातावरणात घुमणारे ते स्वर थांबले नि फुलवा भोवळ आल्यागत थांबली. हळूहळू तिला भान आलं.

पण तेवढ्यात . . .

पाठीमागून येऊन राजवाडेकाकांनी तिला उचलून घेतली. अगदी मायेनं.

'शाब्बास! शाब्बास पोरी! हाडाची कलावंत आहेत तू. तुला माहीत तरी आहे का ते? अग जादूय तुझ्याजवळ जादू. मला खात्री होतीच . . . या श्यामची पारख चुकायची नाही मुळीच.'

'काका . . . तुम्ही घ्याल मला तुमच्या शाळेत?' तिनं निरागसपणं प्रश्न विचारला.

'हो ऽ हो तर! तुझ्यासारख्या गुणी चिमुर्डीला कोण नाही म्हणेल? आता तू इथेच शिकायचंस.'

'बाबा ऽऽ . . .' फुलवानं त्यांच्या कडेवरून उतरून आपल्या बाबाकडे झेप घेतली. त्याच्या गळ्याला मिठी मारून तिनं त्याचे पटापट मुके घेतले. 'बाबा, शाळेत घेणार मला . . .' ती आनंदानं म्हणाली. तिनं बाबाकडे पाहचलं. बाबाच्या डोळ्यातून झरझर पाणी वाहात होते 'बाबा . . .तू रडतोस? . . .

'होय पोरी. पण आनंदाने रडतोय. लई आनंदानं.'

आनंद झाला तर रडतात?

तिला कुठं माहीत होतं ते?

तिनं बाबाचे डोळे पुसले . . . नि राजवाडेकाकांकडे पाह्यलं. हे काय? राजवाडेकाकांनी चष्मा का काढला होता? नि ते चष्म्याच्या काचा का साफ करीत होते? . . . .

या मोठ्या माणसांचं काही समजत नाई बाई . . .

फुलवापुढे मोठ्ठा प्रश्न होता.

पण केवढा आनंदाचा दिवस होता तो. आनंदाचाच का? नवलाचाही!

सकाळी तिला प्रवास घडवणारा . . . .

नवे पदार्थ खाऊ घालणारा . . .

संध्याकाळी रडवणारा . . .

नि रात्री खूप खूप आनंदानं हसवणारा दिवस!

फुलवाला कलानिकेतनमध्ये आणून सोडणारा दिवस!

# फुलवा उमलू लागली

फुलवाला कलानिकेतनमध्ये येऊन बरोबर आठ महिने लोटले होते. सतत पाच तास ती शिकत होती दररोज. काही नृत्याचे धडे . . . काही शास्त्रोक्त माहितीचे धडे, जे तिच्या बाई तिला सोप्या मराठीत तोंडीच देत.

या आठ महिन्यांत ती चांगल्यापैकी मराठी लिहू-वाचू लागली होती. अलीकडे तर तिला इंग्रजी धडेदेखील दिले जात होते. चुकत माकत इंग्रजी बोलायचा ती प्रयत्न करीत असे.

लहान मुलांची ग्रहणशक्ती विलक्षण असते. त्यातून फुलवासारख्या हुशार मुलीची तर सारी शक्ती जास्तीत जास्त शिकण्याकडेच पणाला लागली होती.

फुलवाला सोमवारी श्यामदादाचं पत्र यायचंच आणि म्हणूनच सोमवार उजाडला की फुलवा घाईघाईनं होस्टेलच्या दाराशी पन्नास खेपा घालायची. पोस्टमन येईपर्यंत तिला मुळीच धीर नसायचा. नि तो आल्यावर तर तिला पळभरही थांबवत नसे. उड्या मारीत त्याच्या हातातल्या पत्रांवरून अंदाज घेत ती आपलं पत्र नेमकं हुडकून काढी. पत्र हमखास असे. नि ते आलं रे आलं की ते तिथ्थेच वाचून ती पोस्टमनचीही करमणूक करीत असे. त्यालाही फुलवा भारी आवडायची. तिचे गोड बोलणं . . . . गोड वागणं . . . . नि घायकुतीला येऊन पत्र शोधणं . . . . सारं सारं खूप आवडायचं त्याला.

आज असाच सोमवार . . . .

फुलवाच्या आतबाहेर खेपा.

आणि हे काय ?

तो खाकी डगलेवाला पोस्टमन आलासुद्धा !

पण फुलवासाठी पत्र नाहीच.

'पोस्टमनदादा . . . . नीट बघा ना . . . .' तिनं काकुळतीनं विचारलं . . . .

'नाही फुलवा. आज तुझं पत्र नाहीच आलं तर कुठून देऊ मी ?'

'खरं ?' तिनं जड आवाजात विचारलं. पोस्टमननं तिच्याकडे पाह्यलं नि तिच्या पाठीवर थोपटून तो म्हणाला . . . .'हात्तिच्या आज नाही आलं तर उद्या येईल. बरं . . . .जाऊ मी ?'

जाणार तर होताच तो. त्याशिवाय का राहाणार होता ? किती लोकांची पत्रं वाटायची होती बिचाऱ्याला.

'जा.' फुलवा एवढंच म्हणाली. एवढंच म्हणू शकली ती. तिला वाटलं . . . आईबाबांच्या . . . श्यामदादाच्या आठवणीनं आपल्याला आता रडायला येईल. ती पटकन माघारी वळली. आपल्या खोलीत गेली.

सुनंदा, तिच्या खोलीतली तिची जोडीदारीण पटकन तिच्या जवळ आली.

'आलं पत्र ? दाखव ना ?' ती उत्सुकतेने म्हणाली.

आता मात्र फुलवाला रडू फुटलं. सुनंदा फुलवापेक्षा चार वर्षांनी मोठी ! तिनं पटकन हात पसरले. फुलवा तिच्या कुशीत शिरली.

'एवढी काय रडतेस ? नुसतं पत्र आलं नाही म्हणून ?'

मग काय करू? सोमवार आज,' फुलवाला राहून राहून हुंदके फुटत होते. एवढ्यात वसतीगृहाची मोलकरीण वरती आली. फुलवाला ऑफिसमध्ये बोलावणं आलं होतं तो सांगावा घेऊन.

'जा, राजवाडे सर बोलावतायत ना! पूस बघू डोळे,' सुनंदानं तिची समजूत घातली.

फुलवानं डोळे पुसले. ती खाली उतरली. राजवाडेकाकांच्या खोलीशेजारी उभी राह्यली नि तिनं आत डोकावून पाह्यलं. आत बसलेली माणसं तर अनोळखी दिसत होती. गोरीपान.... लालबुंद. नि त्यांचं नि राजवाडेकाकांचं बोलणं तर तिला मुळीच उमगत नव्हतं.

इतक्यात राजवाड्यांनी तिला आत बोलावलं, 'ये....ये फुलवा, अगं पाह्यलंस का कोण आलंय ते?'

ती आत आली. आपले चिमुकले हात जोडून तिनं म्हटलं 'नमस्ते!'

पाहुणे ती सावळी.... लहानखुरी चिमुरडी हसतमुखानं पहात होते.

'सो... शी इज द वंडरगर्ल! इजन्ट इट?'

'येस... हिअर इज द गिफ्टेड चाईल्ड.'

त्यांचं संभाषण इंग्रजीत चालूच होतं, तोच तिची खास शिक्षिका करुणामयी आत आली. 'या...या करुणामयी' असं म्हणत राजवाडेकाका परत इंग्रजीकडे वळले.

पुष्कळ वेळानंतर फुलूला एवढंच समजलं की करुणामयी सांगतील तसा नृत्यप्रकार तिला पाहुण्यांना करून दाखवायचा आहे.

फुलवानं होकार भरला.

मग तिला बाहेर खेळायला पाठवून मंडळी परत बोलत बसली.

फुलवा बाहेर आली तेव्हा राजवाडेकाकांच्या बगीच्यात एक पिवळं धमक नि सोनेरी वर्खाचं फुलपाखरू या फुलावरून त्या फुलावर उडत होतं. त्याकडे नेमकं तिचं लक्ष गेलं.

काय सुंदर होतं ते फुलपाखरू!

मघाचं पत्राबद्दलचं दुःख... आत्ताच्या पाहुण्यांबद्दलचं कुतूहल.... फुलवा सारं क्षणात विसरली. त्या फुलपाखरामागे धावत सुटली. फुलपाखरू तरी किती लबाड... तिला पिंगा घालावयाला लावत...पळत... उडत...लपाछपी खेळतं होतं.

पाहुणे बागेत येऊन कॅमेरे ॲडजस्ट करीत होते. फुलपाखरामागे पळता पळता ती थडकली तो एकदम लावलेल्या कॅमेऱ्यासमोर... तिनं एकदम ओठांचा चंबू केला. डोळे मोठे मोठे केले. नि ती जागच्या जागीच थबकली.

'वंडरफुल एक्स्प्रेशन!' बोलता बोलता पाहुण्यांचा मुव्ही कॅमेरा आपलं काम उरकीतच होता.

आणि मग काय ठरलं कुणास ठाऊक... सगळी वाद्ये बागेतच आणली गेली नि करुणामयींचे सुस्वर बागेत पसरले. फुलाफुलांतून येणाऱ्या सुगंधासारखे प्रत्येक बोलाला फुलवानं आपल्या कोरीव... रेखीव... सुंदर हालचालींनी रूप दिलं.

पाहुणे तिला सारखे दाद देत होते. 'फाईन.... मार्व्हलस वंडरफुल....' कौतुकाची खैरात करीत होते.

भान विसरून फुलवा नाचत होती.

नि तिची प्रत्येक लयदार हालचाल कॅमेरा टिपीत होता. ... तिला सांगितलेलं काम तिनं इतकं चोख बजावलं की तिचं तिलाच नवल वाटावं.

राजवाडेकाकांनी तर तिच्या पाठीवर शाबासकी देऊन तिला जवळ घेतली... नि म्हटलं, 'शाब्बास पोरी! शाब्बास! अरे .... कुणाला खरं वाटेल? की आठ नऊ महिन्यांपूर्वी ही पोरगी स्टेजवर गप्प उभी होती. नि घाबरून रडलीही होती.'

करुणामयींनी हसून तिचा गालगुच्चा घेतला.

पाहुण्यांनी तिला एक छानसा रंगीत डबा बक्षीस दिला. काय होतं त्यात? डबाभर रंगीबेरंगी चांद्यांची चॉकलेटं.... गोड गोड नि चविष्ट!

फुलवा चकित झाली अगदी.

पाहुण्यांकडे पाहून ती गोड हसली नि म्हणाली, 'थँक्यू!' पाहुणे राजवाडेकाकांना इंग्रजीतून म्हणाले, की 'या परीला...' हो परीला. पोरीला नव्हे बरं का! ...तर काय? 'या परीला बॅले शिकवला पाह्यजे. तिच्या पावलांत जादू आहे जादू!'

करुणामयींनी फुलवाला त्यांचं बोलणं समजावून दिलं. फुलवाचं इवलंसं हृदय आनंदानं भरून आलं.

'कळलं का फुलवा? आता तुझी फिल्म परदेशात जाणार. कुठे माहिताय? आपल्यापासून खूप दूर. रशिया नावाचा देश आहे. तिथली मुलं तुला बघतील. भारतातल्या एका गरीब वस्तीतल्या या माझ्या लाडक्या चिमुरडीचं कौतुक करतील. आहे ना मज्जा?'....

फुलवाला तर आनंदानं बोलताच येईनासं झालं. नि तिला एकदम घरची आठवण झाली. हे सगळं आईला कळायला हवं. ती गुळाचे घारगेच करील एकदम. नि बाबा.... त्याला कळलं की तो नुसता खांद्यावर घालून आपल्याला अंगणभर मिरवीत सुटेल. कालूराम....? .... रुसलाय म्हणे माझ्यावर. पण एकदा मी गेले की? छ? पाच मिनिटंसुद्धा राह्यचा नाही माझ्याशिवाय. नि श्यामदादा! किती चांगलाय तो. त्याच्यामुळेच तर....

'फुलवा...ती बिस्किटं घे बाळ,' राजवाडेकाकांच्या बोलण्यानं फुलवा भानावर आली. पाहुण्यांसाठी चहा बिस्किटं, इडल्या... सारं आता आलं होतं.

फुलवानं मग पाहुण्यांबरोबर त्याचा समाचार घेतला. आणि राजवाडेकाकांची परवानगी घेऊन सगळ्यांना नमस्ते करून ती परत आपल्या खोलीत आली. सगळा थकवा... शीण... तिला पलंगावर बसल्या क्षणी जाणवायला लागला. नि पलंगावर आडवी होताच तिला गाढ झोप लागली. अगदी शांत.

सुनंदा तिच्याकडे एकटक पहात होती. नऊ-दहा वर्षांची चिमुरडी पोर. पण गुण असे असामान्य की मी मी म्हणणाऱ्यांना मागे टाकत ती भराभर नृत्याचे धडे घेत पुढे चालली होती. तिची ती आश्चर्यकारक प्रगती बघून सारी थक्क होत. करुणामयी तर फार खूष होत्या. एवढी कला जन्मजात अंगी घेऊन आलेली मुलगी त्यांची विद्यार्थिनी होती म्हणून... आपण जे जे शिकवू ते ते ती जलद नि सुरेख आत्मसात करते म्हणून... नि त्याहूनही सर्वांना आवडावं असं तिचं गोड सावळं रूप.... नि मधाळ लाघवी वागणं.

आणि अशी ही सर्वांना आपलसं करणारी चिमुरडी सुनंदाची रूम पार्टनर होती. दोघी एकाच खोलीत राह्यच्या. सुनंदाच्या आई-बाबांचं पत्र दर शनिवारी यायचं. ते वाचायच्या दोघींनी.... सोमवारी फुलवाच्या श्यामदादाचं पत्र! हो तिच्या आईला नि बाबाला लिहिता कुठे येत होतं? पण श्यामदादाचं पत्र अगदी सविस्तर असायचं. आईचा निरोप... बाबाचा निरोप... एवढंच काय... छोट्या कालूरामची बारीक सारीक प्रगतीही पत्रात सविस्तरपणे कळवित असे तो. आणि ते सगळं वाचून सुनंदाला तर कालूबद्दलदेखील इतकी माहिती झाली होती नि इतका जिव्हाळा वाटू लागला होता की जसा काही तो तिचाच होता.

शांत झोपलेल्या फुलवाकडे पाहाता पाहाता सुनंदाच्या मनांत हे विचार झरझर पुढे सरकले. खरंच..... किती गोड नि गुणी पोरगी आहे ही. आज पत्र नाही आलं म्हणून रुसली....रडली नि लगेच पाहुण्यांच्या समोर डोळे पुसून आपली कला दाखवायलाही उभी राहिली. किती सुंदर नाचत होती....ह्या खिडकीतून दिसत होतं ना बागेतलं सारं... फुलवा म्हणजे एक हलतं बोलतं सुंदर चित्र आहे चित्र!

सुनंदा नकळत पलंगावरून उठली नि तिनं हलकेच फुलवाच्या गालावर ओठ टेकले. झोपेतदेखील फुलवा हसल्यासारखी वाटली तिला.

सकाळ झाली. नेहमीप्रमाणे फुलवानं आपली सकाळची तयारी भराभर आटोपली....नि ती प्रार्थनेसाठी सुनंदाबरोबर खाली आली.

प्रार्थना संपली.

राजवाडेकाका बोलायला उभे राह्यले. त्यांनी रोजच्या कामकाजाच्या सूचना दिल्या. अन् नंतर ती गोड बातमी सांगितली.

कोणती होती ती बातमी?

ऐकाच तर ....

ते म्हणाले, 'आपल्या राजधानीत यंदाच्या प्रजासत्ताक दिनानिमित्त जे कलापथक जाणार आहे त्यात आपल्या कलाशाळेतील फुलवाची निवड झालेली आहे.'

हॉलमध्ये टाळ्यांचा गजर झाला. सुनंदानं हलकेच फुलवाला ढोसलं!

'ऐट आहे बुवा!'

आणि फुलवा.....

कशी झाली निवड? कुणी केली? कधी केली? प्रश्नांची गर्दीच गर्दी झाली तिच्या मनांत.... सगळ्या मुली तिच्याभोवती गोळा झाल्या होत्या. पण हे कसं काय घडलं हे तिचं तिला तरी कुठं माहीत होतं?

आणि मग राजवाडे सरांनीच जेव्हा तिला ऑफिसमध्ये बोलावून सगळं सांगितलं तेव्हा कुठे तिला सगळा उलगडा झाला. त्याचं असं झालं. कालच्या गोऱ्या पाहुण्यांबरोबर आलेले कमलजीतसिंग नावेचे गृहस्थ हे कलापथकाच्या निवड समितीवर सदस्य होते. त्यांना फुलवाचं नृत्य इतकं आवडलं की त्यांनी तिची निवड पक्की केली नि सकाळी उठल्या उठल्या राजवाडे सरांना तसा फोनही केला.

फुलवाचं मन आनंदानं थुईथुई नाचत होतं. ती तिच्या नृत्यशाळेत गेली ती तशी तरंगतच. त्या दिवशीच्या तिच्या अभ्यासात तिनं इतकं मन घातलं की करुणामयींना शाबासकी वर शाबासकी द्यावी लागत होती.

दमून भागून ती खाली बसली. तेवढ्यात निरोप आला — राजवाडे सरांनी बोलावलंय.

थकली भागलेली फुलवा त्यांच्या ऑफिसात गेली....आणि समोर श्यामदादा उभा होता.

'श्यामदादाऽ' आनंदानं ती ओरडलीच. विसरूनच गेली क्षणभर की ऑफिस आहे हे... राजवाडेसर समोर बसलेयत.... येऊन झटकन त्याला बिलगली.

'श्यामदादा, काल मी पत्राची खूप वाट पाह्यली.'

'अग . . . आज येणार होतो ना मी फुलू, चकीत करायचं होतं बघ तुला . . . ए फुलू . . . हे बघ. आईनं काय दिलयं . . .' गुळाचे घारगे . . . नि बाबानं रिबिनी पाठवल्यायत पाह्यल्यास ? काय ग सोडणार आहेस की नाही मला ?'

फुलवानं नाइलाजानं आपले हात बाजूला केले. आता कुठं राजवाडेसरांकडे तिचं लक्ष गेलं . . . नि ती इतकी लाजली. . . . की पण छे ! राजवाड्यांना तिच्या त्या निष्पाप . . . . निरागस प्रेमाचं इतकं कौतुक वाटत होतं की काही विचारू नका.

'चालू द्या . . . चालू द्या,' राजवाडेकाकांनी म्हटलं; नि ते कलाशाळेत राऊंड मारण्यासाठी उठले . . . . बोलता बोलता खोलीबाहेरही पडले.

श्यामदादाचा हात हातात घेऊन ती म्हणाली . . . 'मी रागावलेय हं खूऽऽप.'

'ते का बुवा ?'

'पत्रं ? . . . .'

'अच्छा अच्छा ! म्हंजे माझ्यापेक्षा तुला पत्राचं महत्व वाटतं ? बरंय बुवा . . . मी आपला जातोच कसा. सोमवारी तुला पत्रं मिळतील हंऽदोन ! . . .'

तिचा हात सोडून तो दोन पावलं पुढे गेलादेखील. पण तिनं एका उडीतच त्याला पकडलं.

'नाई . . . नाई . . . तूही हवास नि पत्रसुद्‌धा,' ती गाल फुगवून म्हणाली.

'बरं बुवा. तुझं ऐकतो . . . बस्स ?' श्यामदादा म्हणाला.

आणि मग दोघं तिथून बाहेर पडली. व्हिजिटर्स रूममध्ये आली. दोघांच्या गप्पांना नुसता ऊत आला होता. आईनं दिलेले गुळाचे घारगे मटकावताना ती त्याला सतरा प्रश्न विचारून भंडावून सोडीत होती.

नि तो . . .

तिच्या प्रगतीबद्‌ल तिचे खूप कौतुक करीत होता. राजवाडेकाकांनी नुकतीच तिच्या चित्रीकरणाबद्‌दल आणि दिल्लीच्या ट्रिपबद्‌दल सांगितलं होतं ना !

'मग काय . . . मज्जाय बुवा. ऐट आहे अगदी एका माणसाची.'

'ए श्यामदादा . . . कशीय रे दिल्ली पण ? मुंबैसारखी ?'

'बघशीलच की तू आता. छान आहे खूप. दिल्लीचे दोन भाग आहेत. नवी नि जुनी. नवी दिल्ली खूप खूप छान आहे. आवडेल बघ तुला.'

'अस्सं ? . . . श्यामदादा, तिथं मला ज्या मुलांमुलींबरोबर नाच करायचाय ना . . . त्याची तयारी करायला आज संध्याकाळपासूनच जायचंय म्हणे . . . सर सांगत होते. आणि बरं का श्यामदादा . . . मला म्हणे बॅले शिकायला जायचंय. रशियन कलापथकात. जमेल का रे मला सगळं ?'

'सगळं जमेल आमच्या फुलूला. प्रयत्न खूप करायचे. अगदी जीव ओतून.'

'जीव ओतून म्हणजे ?

'जीव आतून म्हणजे . . . म्हणजे अगदी मनापासून समजलं ?'

'समजलं. पण श्यामदादा, मी माझं प्रत्येक काम अगदी मनापासून करते.'

'म्हणून तर ते इतकं छान होतं फुलू.' त्यानं तिच्याकडे कौतुकानं पाहचलं. आपल्या अंगी असलेल्या गुणाची आता कुठे थोडी जाण येऊ लागली होती त्या चिमखडीला.

'कालू कसाय रे श्यामदादा ?

'मज्जेत. माझ्याकडे खेळायला येतो ना.'

'माझी आठवण नाही काढीत ?'

'विसरला तो तुला.'

'खोटं . . .'

'खरंच,' श्यामदादा चेष्टेने म्हणाला. पण तिचे डोळे चटकन भरून आले.

'वेडी ! पूस डोळे. अग . . . मुकी जनावरं अशी प्रेम विसरत नसतात. माणसांपेक्षा देखील फार चांगली असतात ती. खरंच !'

तिनं कष्टानं डोळे पुसले.

'आई . . . बाबा . . . लाड करतात ना कालूचे ?'

'तर ! आता-डबल लाड होतात त्याचे . . .'

'होऽऽ माझ्या वाटचे . . . नि त्याच्या वाटचे,' ती हसली. गोड हसली. तिचे शुभ्र दातं चमकले. श्यामदादा तिच्याकडे पहातच राहचला. तिची तब्येत जरा सुधारली होती. गाल वर आले होते. फुलवाचं हसणं तर इतकं गोड दिसत होतं की जशी पानाआडून हसणारी किंचित उमललेली कळीच.

आणि मग कितीतरी वेळ ते एकमेकांना रिझवीत राहचले.

# फुलवाचे 'शाकुंतल'

आज फुलवाचा पहिला जाहीर कार्यक्रम होता. मुंबईच्या एका भल्या मोठ्या सभागृहात! अदययावत.. आलीशान.. भव्य सभागृह. आणि फुलवा?.. त्या भव्य, प्रासादतुल्य सभागृहात नृत्य करण्यास सर्वस्वी योग्य अशीच.

किती मेहनत केली होती फुलवानं गेल्या सहा वर्षांत! करुणामयींच्या आवाजात तिच्या नृत्याचे बोल इतके मिसळून गेले होते की करुणामयीचे सूर नि फुलवाचे नादमय नुपुर हयांची वेगवेगळी... एकटकी... सवयच विसरून गेली होती सारी.

रशियन बॅले शिकून तिच्या पावलांना एक अनोखा हलकेपणा... तरलपणा आला होता तर शास्त्रशुद्ध भारतीय नृत्य शिकून तिच्या प्रत्येक हालचालीला एक आगळा डौल नि दिमाख प्राप्त झाला होता.

त्या दिवशी संध्याकाळच्या प्रार्थनेनंतर बगीच्यात बसलेल्या राजवाडेकाकांनी फुलवाला 'शाकुंतल' या महान संस्कृत नाटकाची गोष्ट सांगितली.. नि फुलवाच्या मनाला एक वेगळीच ओढ लागली. अगदी वेगळी.

'सर.. हे सगळं नाटच मी नृत्यात उभं करीन. मी एकटी! दुष्यंत.. शकुंतला.. भरत!.. सर आपण हया नाट्याला बॅलेची गती देऊ.'!.. आणि भरतनाट्यमचा डौल.'

फुलवा आत्मविश्वासानं सांगत होती. आणि राजवाडेकाका? ते तर तिला प्रोत्साहन देण्यासाठी सदा तयार असत. तिला कलापथकाबरोबर दिल्लीला पाठवायचे ते नेहमी. तिला बॅलेचं शास्त्रशुद्ध शिक्षण मिळावं म्हणून तळमळीनं तिला रशियन कला पथकात रोज संध्याकाळी पाठवीत होते ते सतत पाच वर्षे. भारत सरकारची नॅशनल कल्चरल टॅलन्ट शिष्यवृत्ती मिळविणारी फुलवा ही सर्वांत लहान मुलगी होती. त्यासाठी आवश्यक तो पत्रव्यवहार राजवाडेकाकांनी नेहमीच तत्परतेनं आणि पुढाकार घेऊन केला. फुलवाचा आत्मविश्वास, फुलवाची प्रगती.. तिचं आश्चर्य करायला लावणारं यश.. हे सारं राजवाडेकाकांच्या डोळस तपश्चर्येचं फळ होतं.

फुलवा नटली.. सजली.. आरशासमोर उभी होती ती आणि तिला आरशात एकदम एक ओळखीचा चेहरा दिसला. खूप ओळखीचा. आणि सारं काही विसरून फुलवा ओरडली...

'आलास तू? श्यामदादा!.. आणि बाबा आला? आई माझी?

'होऽऽ! मी आलो. आई आली तुझी. नि बाबासुद्धा आला.'

ती गरकन् वळली नि धावत जाऊन तिनं श्यामदादाचे हात पकडले. त्याच्या भवती गिरकी घेऊन ती म्हणाली.

'लब्बाड!'

'काय बुवा लबाडी केली आम्ही ?'

'काय म्हणे !'

'. . .'

'खोटं पत्र का लिहिलंस ? आं ? सांग आधी . . सांग . .'

'बघायचं होतं. आमच्या नकटुलीच्या नाकावर किती राग जमा होतो ते . .'

'अच्छा ! का ?

'हो. अस्संच.'

'पण मी नकटी नाही नि रागावले तर मुळीसुद्धा नाही. म्हटलं नाही ना यायचं तुम्हां कुणाला . . नका येऊ मर्जी तुमची !!'

'अच्छा ! का ?'

'बघ हं श्यामदादा, तूच रागावलास आता.'

बरं बाई. हरलो मी. कबूल ? भारी नाकानं कांदे सोलू लागलीस हो तू फुलवा . . बरं नाई हे.'

'अय्या . . . ह्या माझ्या नाकानं मी आता कांदे सोलू ? . . .की नाकावर रागाला बसवू ? काय काय करू रे ?'

'पुरे पुरे हं. कुणी ऐकलं तर म्हणेल . . . फुलवा मोठी झाली हं आता ! . . .'

'श्यामदादा, बाबाला बोलाव ना आत.'

'अहं. आता नाही. ती दोघं पाहिल्या नंबरच्या खुर्च्या पकडून बसलीयत. तुझ्या आयशीला तर ह्या एअरकंडिशनमुळे थंडीच भरलीय. आता एकदा केव्हा पडदा उघडतो नि केव्हा फुलू दिसतेयसं झालंय त्यांना. आटप बघू.'

तेवढ्यात करुणामयी आत आल्या.

'तिसरी घंटा द्यायची का फुलवा ?'

'अं ?हं . . .' तिनं एवढंच म्हटलं नि ती खाली वाकली. तिनं करुणामयींच्या चरणाला स्पर्श केला . . . श्यामदादाच्या पायांना स्पर्श केला.

'अग अग . . हे काय ?'

'हं काहीच नाही. माझ्या श्यामदादानं मला आज इथे उभी केलीय. श्यामदादा तू . .'

बोलता बोलता तिचे डोळे भरून आले.

'अहं . . आता रडायचं नाही. बिलकूल. मेकप खराब होईल तुझा.'

'चला . . . फुलवा . . . मुथ्थुस्वामी तिसरी घंटा वाजवण्यासाठी खोळंबलेयत.'

ती स्टेजवर आली. तिनं भूमीला नमस्कार केला. आणि पडदा उघडला. स्टेजवर एक रेखीव कोरीव चित्र उभं होतं . .

आणि ते पाहता पाहता फुलवाच्या आई-बाबांचे डोळे काठोकाठ भरून आले होते.

बांधावरचं एक इवलंसं रानफूल आज कोंदणातल्या हिऱ्यागत चमचमत होतं. लखलखत होतं.

तिनं समोर पाहचलं. . . . आई . . . बाबा . . . श्यामदादा . . . राजवाडेकाका . . . मुंबईचे शेरीफ . . . मेयर . . . आदी मंडळी . . .

आणि क्षणार्धात तोडा सुरू झाला. प्रत्येक बोल सजीव, रेखीव, लावण्यमयी झाला. फुलवाची शकुंतला वनात बागडत होती. हे काय ?

कोण दिसलं शकुंतलेला ?

दुष्यंत — शकुंतलेचा मनोहारी संवाद समोर चित्रमय झाला . . .

हा दुष्यंत परत चालला ?

शकुंतला . . .विरहिणी . . .

शाकुंतलातली दृष्यं पाहून राजवाडेकाका भारावून गेले अगदी ?

'सुंदर !'शेरीफसाहेबांनी दाद दिली.

खरोखरीच फुलवाचा नृत्यसंभार अवर्णनीय होता.

आणि मग कार्यक्रमाची रंगत एकसारखी वाढतच गेली.

फुलवाचे आईबाबा तिचे ते अनोखं रूप पाहून भारावून गेले होते. आणि श्यामदादा ? त्याला आठवत होती त्याच्या डोंगरमाथ्यावरल्या घरात त्याच्या मुरलीच्या तालावर नाचणारी एक इवलुशी गोड पोरगी . . .

## नवे बेत

छोटी सुटी!

भारतदर्शनच्या कार्यक्रमाला यंदा जाताच आलं नव्हतं फुलवाला.

कार्यक्रमावर कार्यक्रम!

आणि आता ही राखून ठेवलेली इवलीशी सुटी.

घरी जाण्यासाठी राखून ठेवलेली.

खास दुसरीकडे कुठ्ठे जायचं नाही या सुटीत.

घराची ओढ लागली होती तिला.

इतकी वर्षं तिनं साऱ्यांचं ऐकलं होतं. पण आता ऐकायची पाळी होती साऱ्यांची.

हो! फुलवाला रशियाला जायला मिळणार होतं.

चक्क मास्कोला!

तिच्या नव्या स्वरूपात सादर केलेल्या शाकुंतलानं रशियन पत्रकार प्रभावित झाले होते. मुंबईच्या प्रत्येक प्रमुख दैनिकानं, साप्ताहिकानं फुलवाचं फोटोसहित अगदी तोंड भरून कौतुक केलं होतं.

मुंबईत तर जाहीर कार्यक्रमांच्या वर्षावानं तिला घेरून टाकलं होतं.. पण सबंध भारतात तिचा कार्यक्रम जागोजागी होणार होता. तशी जाहीर आमंत्रणंच आली होती मुळी तिला... पण रशियाला जायला मिळणार होतं ही केवढी कौतुकाची बाब! तेही अगदी रशियन सांस्कृतिक मंडळातर्फे. त्यांच्या खर्चानं.

म्हणजे पहा!

तर आता फुलवाचा घरी जाऊन यायचा हट्ट पुरवणं राजवाडेकाकांना भागच होतं.

एरवी दर तीन महिन्यांनी तिचे आईबाबा नाहीतर श्यामदादा इकडे येत असत...

तिच्या गरीब बापाला इकडे येता यावं म्हणून कितीदा तरी राजवाड्यांनी स्वत:च्या खिशातून पैसे खर्च केले होते.

एरवी प्रत्येक सुटीत फुलवाला कलापथकाबरोबर भारतदर्शनला जावं लागायचं.. संस्थेच्या मदतीसाठी जागोजाग कलापथक कार्यक्रम करी.. त्यात फुलवाचा वाटा मोठा असे.

पण ही उणीव राजवाडे अशा प्रकारे मग भरून काढीत नि तुटपुंजं का होईना.. फुलवाचे समाधान करण्याचा प्रयत्न करीत.

पण आता प्रत्यक्ष घरी जाऊन यायला मिळणार हे जेव्हा तिला कळलं तेव्हा फुलूची एकच गडबड उडाली.

घरी.. तिच्या लाडक्या वस्तीत जायचं होतं ना तिला.

मनानं तर ती केव्हाच पोचली होती तिथं. तिच्या लाडक्या कालूरामला घेऊन धावत सुटली होती ती. इवलुश्या निळ्या रानफुलांना कुरवाळीत होती. नि त्या झुळूझुळू वाहणाऱ्या झऱ्याचे लाडके तुषार अंगावर झेलीत होती.

तिच्या खोपटीत तर तिनं केव्हाच जाऊन हैदोस घातला होता मनानं.

आईचे गुळाचे घारगे सगळे मटकावून टाकून तिचा एक जोरदार धबुकादेखील खाल्ला होता . . .

आणि धबुका खाऊनही हसत सुटली होती.

आणि बाहेर पळत जाऊन तिनं केव्हाच ओरडून सांगितलं होतं., 'आये मी श्यामदादाक जाताव गो ऽऽ . .'

## फुलवा रशियात

टाळ्यांचा गजर होत होता. लालसर गोरी, मजबूत हाडापेराची नि निळसर डोळ्यांची ती माणसं थिएटरमध्ये फुलवाच्या त्या अजब नृत्यप्रकाराचं कौतुक करीत होती. तिच्या पावलांतील चपलता . .तिच्या बोलक्या डोळ्यांतील जादू आणि तिच्या मोहक लयबद्ध हालचालींतला गोडवा ह्या साऱ्यांनी मोहीत झाली होती. आणि फुलवा ? . . त्यांना झोकात अभिवादन करून त्यांच्या कौतुकाचा विनम्र स्वीकार करीत होती.

तिचे सगळे नृत्यप्रकार परदेशी प्रेक्षकांनी डोक्यावर घेतले.

तिची शकुंतला . . . तिची उर्वशी . . . तिची सिता . . . त्यांना अतिशय आवडली. प्रत्येक नृत्यप्रकार प्रथम प्रभावीपणे कथारूप सांगून नंतर नृत्यात सादर करण्याची तिची पद्धत तर त्यांना एकदम आवडून गेली.

हॉलभर पसरली होती कौतुकाची लाट ! आणि स्टेजवर उभी होती फुलवा !

. . . तिच्या डोळ्यांसमोर उभी होती एक छोटी मुलगी. राजवाडेकाकांच्या शाळेत स्टेजवर उभी राहून घळघळा रडलेली. राजवाडे तिच्या मदतीला आलेले होते . . आणि नंतर . . स्टेजवरून झरझर खाली उतरून ती बापाच्या कुशीत शिरली होती. त्या अवघड वेळेला त्यानं फुलवाला गच्च मिठीत घेतलं होतं.

. . . किती बदललं होतं आता सारं ! इंग्लिश . . . मराठी हिंदी . . .गुजराती . . भारतातील झाडून साऱ्या वृत्तपत्रांनी आणि मासिकांनी फुलवाचं मुक्तकंठानं कौतुक केलं होतं. तिच्या वेगवेगळ्या नृत्यमय हालचालींना फोटोत बांधलं होतं. भारतीय प्रेक्षकांमध्ये ती अत्यंत लोकप्रिय झाली होती. त्यांच्या कौतुकल्या नजरा झेलून ती चक्क परदेशी आली होती . . . परदेशी ! आणि आज टाळ्यांच्या गजरात उभी होती त्यांच्यापुढे.

तिचा तो सदाबहार कार्यक्रम संपला. निळा सुंदर पडदा सरसर सरकला आणि विनम्र सुहास्य अभिवादन करणाऱ्या फुलवाला प्रेक्षकांनी रुमाल उडवून . . टाळ्या वाजवून . . दाद देत निरोप दिला.

फुलवा आपला नृत्यसाज उतरण्यासाठी खोलीत आली तेव्हा दारापाशीच करुणामयींनी तिला मिठीत घेतली. तिच्या गालावर ओठ टेकून करुणामयी म्हणाल्या . . 'जिंकलीस पोरी तू जिंकलीस ग . . ! . .'

फुलवा करुणामयींच्या उबदार कुशीत होती आणि तिचे डोळे पाझरत होते. झर झर झर . .

'का ग ? रडतेस . . ?'

' . . . '

'ए फुलू ! . .'

'बाबा..' तिच्या तोंडून फक्त एवढाच शब्द निघाला आणि मग हुंदक्यावर हुंदके फुटायला लागले. करुणामयींना वाईट वाटलं पण त्या बोलल्या मात्र काहींच नाहीत. मायेनं तिच्या पाठीवरून हात फिरवीत राहच्यल्या. तो हातच जणू बोलत होता... उगी फुलवा उगी!

विदेशी व्यवस्थापक तेवढ्यात आत आले. एवढं कौतुक प्राप्त झालेली, आपल्या नृत्य-कार्यक्रमानं उत्पन्नाचा विक्रमी आकडा संस्थेला मिळवून देणारी ती नाजुक सुंदर मुलगी अशी हमसाहमशी रडताना पाहून ते एकदम कावरेबावरे झाले.

'व्हॉट हॅपन? एनिथिंग रॉंग?' त्यांनी विचारलं. 'इजन्ट शी हॅपी?'

त्यांना हातानंच थांबण्याची खूण करून करुणामयींनी सांगितलं.. 'एव्हरीथिंग विल बी ऑलराईट. लीव्ह हर अलोन फॉर सम टाईम.'

व्यवस्थापक बुचकळ्यात पडले. बोलले मात्र काहीच नाहीत.

करुणामयी फुलवाला विश्रांतीगृहात घेऊन गेल्या. तिला कपडे आणि साज उतरविण्यास त्यांनी मदत केली. एक सैलसर गाऊन तिच्या अंगावर चढवून त्या म्हणाल्या..

'फुलू..झोप पाहू आता तू. कसला विचार करू नकोस. तुझ्या बाबाचं ऑपरेशन अगदी व्यवस्थित झालंय. अग खरंच. मघा मी फोन लावला होता.. आपल्या भारतात! आणि खुद्द राजवाड्यांनीच दिली ही बातमी. मग तर बसेल ना विश्वास? अं? तुझा कार्यक्रम चालू होता ना.. म्हणून सांगायची थांबले आणि आता सांगणार तर तुझं आपलं रडू रडू..!'

'खरंच?'

'अगदी खरं. पूस पाहू डोळे आणि हास बघू माझ्याकडे पाहून. अगदी गोड.. हं.. अश्शी,' तिच्या गालावर उमटलेल्या गोड खळीकडे पाहात करुणामयी कौतुकाने म्हणाल्या.

'वेडी ती.. उगाच काळज्या करीत बसते! झोप आता निवांत. थकलीयस खूप. मी आता बाहेरच्या खोलीत जाते. जाऊ ना? ते बिचारे व्यवस्थापक गोंधळून गेलेयत अगदी. त्यांना वाटतंय.. ह्या वेडचा पोरीला झालं तरी काय एकदम? आमची व्यवस्था आवडली नाही की काय? त्यांचा गैरसमज दूर करायला हवा मला. अं? जाऊ मी?..'

'हो,' फुलवा एवढंच म्हणाली तशी त्या बाहेर पडल्या. ती खोली वातानुकूलित होती. फुलवाला बरं वाटत होतं. त्या थंड वातावरणापेक्षा देखील तिच्या मनावर थंड तुषारांचे सिंचन केलं होतं करुणामयींच्या गोड शब्दांनी.

होय! फुलूचा बाबा सुखरूप होता. त्याचं ऑपरेशन यशस्वीपणे पार पडलं होतं.

तिनं डोळ्यावर हात ओढून घेतला. पर बंद पापण्यांपुढं उभं होतं तिचं चिमुकलं खोपटं. त्यात उड्या मारणारा कालूराम चुलीपाशी बसून तांबूस झालेली आई.. नि लाकूडफाटा आणून दमलेला.. बाहेरच्या खाटेवर विसावलेला तिचा बाबा..!

त्या सुंदर बिलोरी स्वप्नाला किती वर्षे लोटली ? किती ?

पण काही चित्रं सदा ताजी नि टवटवीतच दिसतात ना.. तश्याच होत्या त्या लहानपणीच्या जपून ठेवलेल्या चित्रमय.. सुंदर आठवणी.

फुलवाला गावी जायचं होतं ह्या दौऱ्याअगोदर. तसं मुळी ठरलेलंच होतं. पण अचानक बेत बदलून गेला. पार बदलून गेला. श्यामदादाच हजर झाला फुलवाच्या खोलीवर.

'का रे ? न्यायला आलास मला ? अरे यावेळी राजवाडेकाकासुद्धा स्वत: येणारेत मला घेऊन. आपल्या गावी राहणार आहेत. आमच्या खोपटीत,' ती म्हणाली होती.

'फुलवा.. आपल्याला हॉस्पिटलमधे जायचंय..' श्यामदादा गंभीरपणे म्हणाला.

'काय ? हॉस्पिटलमधे ?'

'हो तुझ्या बाबाला घेऊन आलो मी.'

'काऽऽय ? श्यामदादा..!..'

'अग झाड पडलं त्याच्या अंगावर. मुका मार! मला भीती वाटली. म्हटलं इकडे घेऊन येऊ. तू घाबरू नकोस. मुंबईतले डॉक्टर फार हुशार असतात. अग खरंच ..'

'चल..' एकच शब्द उच्चारू शकली बिचारी. आणि मग रडूच कोसळलं तिला.

तिला धीर देत.. तिची समजूत काढीत.. कशीबशी श्यामदादानं तिला हॉस्पिटलमध्ये नेली.

आईचा सुकलेला चेहरा पाहून मात्र फुलवानं धीर गोळा केला. डोळ्यातली आसवं निपटली आणि आईलाच धीर दिला.

'आई.. घाबरू नुको.. बाबा बेगीन बरा होणार... बेगीन...'

डॉक्टरांच्या नि श्यामदादाच्या सांगण्यावरून फुलवाला बरंच काही समजलं होतं.

तिच्या बाबाच्या अंगावर मोठ्ठं झाड पडलं होतं. त्याच्या पोटाला मुका मार बसला होता जबरदस्त! आतडं खालती सरकलं होतं नि ऑपरेशन करून ते व्यवस्थित जागच्या जागी बसवायला हवं होतं. नाहीतर बाबाला फार त्रास झाला असता. आपलं लाकुडतोडीचं कष्टाचं काम त्याच्याच्यानं झालं नसतं.

पण फुलवाचा बाबा फार अशक्त झाला होता म्हणून डॉक्टर थोडे दिवस थांबणार होते. पूर्ण विश्रांती... चांगला आहार.नि भरीला हॉस्पिटलमधील टॉमिकं ह्यांनी बाबाची तब्येत सुधारली की लगेच ऑपरेशन...

फुलवानं शहाण्या मुलीसारखं सगळं नीट ऐकून घेतलं. परदेशी जायची सगळी तयारी जय्यत झालेली. तिचं नि करुणामयीचं तिकिटसुद्धा रशियन पाहुण्यांनी काढून आणलं होतं. त्या अगोदर छोटीशी सुटी.. मग ती चार दिवसांची का होईना.. गावी.. सातपुड्याच्या कुशीत काढावी.. असं छाटेसं स्वप्न होतं फुलूचं. पण कसलं काय न कसलं काय..!

आता आपण इथं असेपर्यंत बाबाचं ऑपरेशन एकदा सुखरूप पार पडू दे अशी ती देवाजवळ सारखी प्रार्थना करीत होती.

पण तिचा जायचा दिवस उजाडला तरी तिच्या मनासारखं काही नाही. डोळ्यांतले अश्रू खोल दडवीत करुणामयींचा हात धरून ती विमानात बसली.

तिचा पहिला विमान प्रवास!

ज्या मुलीनं गुळाची चहा नि बैलगाडी ह्याखेरीज दुसरं जग पाहचलं नव्हतं ती फुलू विमानात बसली होती चक्क!

. . पण तिला त्याची एवढीसुद्धा अपूर्वाई वाटत नव्हती. मागं श्यामदादाबरोबर एस्. टी. त बसल्यावर पळणारी झाडं मोजणारी इवलुशी फुलवा आज विमानात बसून मात्र घटका पळे मोजीत होती. बाबाच्या तब्येतीसाठी देवाजवळ प्रार्थना करीत होती.

आणि तशाही परिस्थितीत फुलवानं आपले कार्यक्रम नीटपणे . . . सुरेखपणे सादर केले.

पण कार्यक्रम संपताच . . .

मनावरचं ओझं परत तिथे गच्च येऊन बसलं होतं. पण करुणामयींनी तो गोड निरोप सांगितला आणि . . .

पापण्या अलगद मिटल्या.

. . ती बाबापाशी बसली होती.

त्याचा हात हाती घेऊन.

खरंच! माणसाला स्वप्नं पडली नसती तर जगणं तरी शक्य झालं असतं काय?

# 'मयुरा' — फुलवाचा गौरव

फुलवाला भारतात येऊन आता दीड महिना झाला होता. दिल्लीला पार्वतीकुमारांनी तिचा विशेष कार्यक्रम आयोजित केला.

कार्यक्रमाला कोण आलं होतं माहिताहे ? प्रत्यक्ष पंतप्रधान !

आणि त्याहूनही तिच्या मनाला आनंद देणारी एक व्यक्ती . . तिचा बाबा . . ! . .

श्यामदादा नि आईच्या मधोमध बसला होता.

स्टेजवरून तिने एकदा डोळे भरून त्याच्याकडे पाहचले . . आणि मग नूपुर रुणझुणले.

आपल्या पावलातल्या जादूनं तिनं परत एकदा सगळ्या प्रेक्षकांना मोहिनी घातली.

तिची शकुंतला तर पंतप्रधानांच्या इतकी पसंतीस उतरली की स्टेजवर येऊन त्यांनी तिची पाठ थोपटली . . आणि . .

'मयुरा' हा किताब तिला बहाल केला . . .

टाळ्यांचा गजर थांबता थांबत नव्हता. करुणामयी आणि राजवाडेकाका ह्यांनी घडवले एक सुंदर स्वप्न साकार झालं होतं.

तिचा बाबा तर वेड्यासारखा रडायलाच लागला. पण आजचे त्याचे अश्रू आनंदाचे होते.

अत्यानंदाचे ! . . .

कार्यक्रम संपला. आपला साज उतरवीत होती ती. तेवढ्यात श्यामदादा आत आला.

'फुलू . . . खूऽऽ प छान !'

'खरंच ?' तिनं एक गिरकी घेतली

'श्यामदादा, आता मी गावी येणार. निळुल्या फुलांना भेटणार . . . धावणाऱ्या ओढ्यात पाय टाकून बसणार . . . तुझ्याशी गप्पा . . . खरंच . . . माझा कालूराम . . . कालू कसाय रे ? आठवण काढतो ना माझी ? रुसलाय ना . . .'

'हँऽ !' . . . श्यामदादा मोठ्यांदा हसला. 'चार पोरांचा बाप झालाय तो आता.'

'खोट्टंऽ'

'काय खोट्टं ? . . . तुला काय वाटलं तू तिथून गेलीस तेव्हा होतं तस्संच आहे सारं जग ? फुलू . . . तुझा श्यामदादा आपला जीवनक्रम बदलून आता आदिवासींच्या सेवेत गुंतलाय . . . दगडांचा अभ्यास करण्यापेक्षा माणसांचा अभ्यास करणं अधिक आवडू लागलंय त्याला. फुलू, जग फार भरभर बदलतं बेटू . . . निसर्गनियम आहे हा . . . मी काय . . . कालू काय . . . जरा आरशात बघ ! स्वत:कडे . . . तू राहचलीयस का तेवढीच ? आँ ?'

श्यामदादा बोलायचा थांबला.

ती नुसतीच चकित होऊन त्याच्याकडे पाहात राहचली.

'अरेच्या! . . .' एवढंच म्हणू शकली ती.

कलत्या मानेनं तिनं समोरच्या आरशात पाहचलं.

समोरच्या आरशातली युवती तिच्याकडे पाहून गोड हसली. खरंच! एका छोटचा कळीचं उमलू लागलेलं फूलच नव्हती फुलवा ?

अनेक वळणं घेत तिच्या इवल्याश्या आयुष्यानं केवढं सुंदर रूप घेतलं होतं. फुलवा!

खरंच! तिच्या नावाप्रमाणंच फुलू लागली होती ती!

* * *

